भूसंपादन अधिनियम,१८९४ मधील कलम १८ अंतर्गत मा.दिवाणी न्यायालयाच्या निर्णयाविरुध्द वरिष्ठ न्यायालयात अपीला बाबतच्या कार्यवाहीचे निकष.

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग

**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण -२०१४/प्र.क्र.४१/ भाग -१/ अ-४**

हुतात्मा राजगुरु चौक
मादाम कामा मार्ग, मंत्रालय मुंबई-३२
तारीख: ०३ नोव्हेंबर, २०१६.

**वाचा -** **शा.नि. म.व व.विभाग क्र.एलक्युएन-०१/२०११/प्र.क्र.३०/अ-२, दि.१३.१०.२०११ व शुध्दीपत्रक दि.१८.२.२०१२**

**प्रस्तावना -**

भूसंपादन अधिनियम, १८९४ च्या तरतुदीनुसार राज्यातील विविध प्रकल्पांसाठी शासनाच्या विविध विभागाकडून खाजगी जमिनीचे भूसंपादन सार्वजनिक प्रयोजनासाठी करण्यात येत होते. भूसंपादन अधिनियम, १८९४ च्या कलम ११ अन्वये निवाडा जाहीर केल्यानंतर निवाडयातील नुकसान भरपाई मान्य नसल्यास उक्त अधिनियमातील कलम १८ अन्वये संबंधित भूधारकांना मा.दिवाणी न्यायालयात भूसंदर्भ दाखल करण्याची तरतुद होती. अशा प्रकरणांमध्ये मा.दिवाणी न्यायालयाने दिलेला वाढीव मोबदल्याचा आदेश संबंधित प्रशासकीय विभागास मान्य असल्यास संबंधित प्रकरणांबाबत विधी व न्याय विभागाच्या सल्ल्याने सहमती (Acquiesce) दर्शविण्यात येऊन संबंधित प्रकरणांमध्ये वरिष्ठ न्यायालयात अपील दाखल न करण्याचा निर्णय घेण्यात येतो. तथापि, ज्या प्रकरणांमध्ये मा.दिवाणी न्यायालयाने दिलेला वाढीव मोबदल्याचा आदेश संबंधित प्रशासकीय विभागास मान्य नसल्यास विधी व न्याय विभागाचा सल्ला घेऊन वरिष्ठ न्यायालयात अपील करण्याची कार्यवाही करण्यात येते.

मा.मुख्यमंत्री महोदयांच्या अध्यक्षतेखालील वॉर रुम बैठकीमध्ये इतर मुद्यांबरोबरच भूसंपादन अधिनियमातील तरतूदीनुसार कलम १८ खालील मा.दिवाणी न्यायालयाच्या निर्णयाविरुध्द वरिष्ठ न्यायालयात दाखल करण्यात आलेल्या प्रकरणांमध्ये झालेले बहुतांश निर्णय हे शासनाच्या विरोधात देण्यात येत असून शासनाच्या बाजूने देण्यात आलेल्या निर्णयांची संख्या तुलनात्मक दृष्ट्या अत्यल्प आहे. तसेच सद्य:स्थितीत मा.दिवाणी न्यायालयामध्ये कलम १८ खालील सुमारे ५०,००० दावे प्रलंबित असल्याची बाब बैठकीमध्ये निदर्शनास आणण्यात आली. वरिष्ठ न्यायालयातील अपीलात दाखल प्रकरणांमध्ये निर्णय लागण्यास खूपच कालावधी जात असल्यामुळे, भूसंपादन कायद्याच्या तरतुदीनुसार १५% व्याजाचा भार शासनास नाहक सोसावा लागतो. त्यामुळे भूसंपादन अधिनियम,१८९४ अंतर्गत कलम १८ खालील मा.दिवाणी न्यायालयाने दिलेल्या वाढीव मोबदल्याच्या आदेशाविरोधात कोणत्या परिस्थितीत अपील दाखल करण्याची आवश्यकता नाही, याबाबत तपासणी करुन निर्णय घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याबाबत सर्वंकष विचारविनिमय करुन शासन पुढील प्रमाणे निर्णय घेत आहे.

## शासन निर्णय -

भूसंपादन अधिनियम, १८९४ मधील कलम १८ खालील तरतूदींनुसार मा.दिवाणी न्यायालयात दाखल करण्यात आलेल्या प्रकरणांमध्ये मा.न्यायालयाने दिलेल्या वाढीव मोबदल्याच्या आदेशाविरुध्द करावयाच्या अपीलासंदर्भातील निकष खालीलप्रमाणे राहतील :-

१) मा.दिवाणी न्यायालयातील कलम १८ खालील भूसंदर्भातील जमिनीचा कलम ४ च्या अधिसूचनेच्या दिनांकास प्रचलित रेडी रेकनर दर विचारात घेता, वाढीव मोबदल्याच्या आदेशातील रक्कम जर नागरी भागात दुप्पट व ग्रामीण भागात चौपट या मर्यादेत व्याजासह येत असेल, तर मा.दिवाणी न्यायालयाच्या निर्णयाविरुध्द वरिष्ठ न्यायालयात अपीलात जाण्याची आवश्यकता नाही.तसेच सदरची रक्कम "भूमी संपादन, पूनर्वसन व पूनर्स्थापना करताना वाजवी भरपाई मिळण्याचा व पारदर्शकतेचा हक्क अधिनियम, २०१३" नुसार देय असलेल्या नुकसान भरपाई रक्कमेपेक्षा जास्त असू नये.

२) अशा प्रकरणी संबंधित प्रशासकीय विभाग/संपादक संस्था यांनी मा.दिवाणी न्यायालयाचा निर्णय मान्य करुन त्यानुसार वाढीव मोबदल्याची रक्कम भरणा करण्याबाबत आवश्यक ती कार्यवाही तातडीने/विनाविलंब करण्यात यावी. उक्त कायद्याच्या तरतुदीनुसार १५% व्याजाचा आर्थिक भार वाढणार नाही, याची काटेकोरपणे दक्षता घेण्यात यावी.

३) उपरोक्त क्रमांक १ मध्ये नमूद केलेल्या प्रकरणांखेरीज उर्वरित प्रकरणांची प्रशासकीय विभागाने/संपादक संस्थेने विधी व न्याय विभागाच्या सल्ल्याने तातडीने तपासणी करुन वरिष्ठ न्यायालयात अपील दाखल करण्याच्या आवश्यकतेबाबत गांभीर्याने व जाणीवपूर्वक निर्णय तातडीने घ्यावा.

४) उपरोक्त क्रमांक १ मध्ये नमूद केलेल्या ज्या प्रकरणात अपिलात जाण्याची आवश्यकता नाही अशा प्रकरणामध्ये जर प्रशासकीय विभागाने अपीलात जाण्याचा निर्णय परस्पर घेतल्यास व सदर अपीलाचा अंतिम निर्णय शासनाच्या विरोधात लागल्यास उपरोक्त क्रमांक १ नुसार देय असणाऱ्या रक्कमेवरील अतिरिक्त रक्कम संबंधित विधी अधिकारी व संबंधित प्रशासकीय विभागाचा अधिकारी यांचेवर जबाबदारी निश्चित करुन ती रक्कम त्यांचे कडून वसूल करण्यात यावी.

५) मा.दिवाणी न्यायालय व मा.उच्च न्यायालयामध्ये निर्णयासाठी प्रलंबित असलेली प्रकरणे संदर्भाधिन शासन निर्णयाच्या तरतुदीनुसार लोकअदालती समोर सादर करण्यात यावीत व त्यामध्ये जास्तीत जास्त प्रकरणांमध्ये तडजोड करुन प्रकरणे निकाली काढण्यात यावीत.

सदरहू शासन निर्णय वित्त विभागाकडील अनौपचारीक संदर्भ क्र.अनौ.सं.क्र.२२३/२०१६/व्यय-९, दि.१६/०७/२०१६ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६११०३१६३६५३८६१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Subhash K Gawade

Digitally signed by Subhash K Gawade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=40b8b2876e2135f5b158b877f59754b2a7ddf64e0cf59f2dc33ad60b8bce5bcd, cn=Subhash K Gawade
Date: 2016.11.03 16:39:11 +05'30'

**(सु.कि.गावडे)**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२. मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव
३. मा.राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव
४. प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग
५. अप्पर मुख्य सचिव, वित्त विभाग
६. सचिव, विधी व परामर्शी (विधी व न्याय विभाग)
७. प्रधान सचिव, जलसंपदा विभाग
८. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/ सचिव मंत्रालय, मुंबई
९. सर्व विभागीय आयुक्त
१०.सर्व जिल्हाधिकारी
११.भूसंपादन कार्यासन - अ-१, अ-२ व अ-३
१२.निवडनस्ती- अ-४